अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषदेच्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पासून संस्था टप्प्याटप्प्याने बंद करण्यास शासन मान्यता देण्याबाबत.

सरदार पटेल मेमोरिअल सोसायटीचे नामदेवराव पोरेड्डीवार कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, मु.मौजा बोदली, धानोरा रोड, गडचिरोली.

## महाराष्ट्र शासन

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्र.मान्यता-२०२५/प्र.क्र.१३/तांशि-४**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २१ एप्रिल, २०२५.

**वाचा** :-१) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र एफ क्र.वेस्टर्न/१-३५०८३१६०१५/२०१८/कंप्लिट क्लोजर, दि.१२.०२.२०१९.

२) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/एनजीसी/संस्था बंद-मान्यता/२०२४/४३७, दि.०२.०७.२०२४.

३) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/एनजीसी/संस्था बंद-मान्यता/पोरेड्डीवार/२०२५/१७०, दि.१३.०३.२०२५.

**प्रस्तावना :** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी त्यांच्या वर नमूद क्र.१ येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन तसेच, संचालक, तंत्र शिक्षण यांनी वर नमूद क्र.२ व ३ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार, सरदार पटेल मेमोरिअल सोसायटीचे नामदेवराव पोरेड्डीवार कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, मु.मौजा बोदली, धानोरा रोड, गडचिरोली ही संस्था शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पासून टप्प्याटप्प्याने बंद करण्यास शासन मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:** अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन व संचालक, तंत्र शिक्षण यांनी प्रस्तावित केल्याप्रमाणे, सरदार पटेल मेमोरिअल सोसायटीचे नामदेवराव पोरेड्डीवार कॉलेज ऑफ इंजिनिअरींग ॲन्ड टेक्नॉलॉजी, मु.मौजा बोदली, धानोरा रोड, गडचिरोली ही संस्था शैक्षणिक वर्ष २०२१-२२ पासून टप्प्याटप्प्याने बंद करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती :-**

१) सदर संस्थेतील बंद करावयाच्या अभ्यासक्रमांच्या संबंधित सर्व दस्तऐवज जसे की गुणपत्रिका, उत्तरपत्रिका, निकालपत्रे, विद्यार्थ्यांचे पत्ते, फीच्या पावत्या इत्यादी बाबी संस्थेने संबंधित विद्यापीठाकडे सुपूर्द करणे आवश्यक राहील.

२) संस्थेतील संबंधीत अभ्यासक्रमासाठी नियुक्त शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांच्या पर्यायी व्यवस्थेबाबत तसेच सेवाविषयक व इतर बाबतीत न्यायप्रविष्ठ असलेल्या सर्व प्रकरणांची जबाबदारी संस्था प्रमुखांची राहील .

३) भविष्यकाळात कोणतेही न्यायालयीन प्रकरण उद्भवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जबाबदार राहील.

४) संस्थेकडून शासनाची वसुली अद्यापि थकीत असल्यास त्याचा भरणा करणे संस्था प्रमुखांवर बंधनकारक राहील.

५) संस्थेमध्ये विविध अभ्यासक्रम राबविण्यासाठी आवश्यक स्थावर-जंगम मालमत्तेविषयी या संस्थेने शासनाकडून किंवा कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेतलेले असल्याचे यापुढे निदर्शनास आल्यास त्याची परतफेड करण्याची सर्वस्वी जबाबदारी संस्थेची राहील.

६) सदर संस्था टप्प्याटप्प्याने बंद करताना त्या संस्थेतील प्रवेशित विद्यार्थ्यांना व माजी विद्यार्थ्यांना अभ्यासक्रम पूर्ण होईपर्यंत शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन देण्याची व परिक्षेस बसण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी संस्था घेईल. संस्थेने या शैक्षणिक सुविधा उपलब्ध करुन न दिल्यास, संस्थेविरुध्द नियमानुसार कारवाई करण्यात येईल व शासनाकडे ठेवलेली संचित ठेव शासन जमा करण्यात येईल.

७) संस्थेमधील माजी विद्यार्थ्यांस कोणत्याही प्रकारचे रेकॉर्ड हवे असल्यास, ते संस्थेच्या मुख्य कार्यालयातून देण्यात येईल.

८) संस्थेतील संबंधित अभ्यासक्रमासाठी नियुक्त केलेल्या संस्थेतील शिक्षक व कर्मचारी यांना नियमानुसार देय असलेले वेतन, वेतन भरपाई व अन्य आर्थिक लाभ प्रदान करणे संस्थेला बंधनकारक राहील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२११५१६१०९८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

THORAT AJITKUMAR ARUNRAO

Digitally signed by THORAT AJITKUMAR ARUNRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=891b9227cbfc5a688b110ab53810ab4d94960474021325e10e794cb784d2e6a9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F7113210379DB8F8304AC958953787A4C6EC1B3F193419BA4C6971FA4CD5F15E, cn=THORAT AJITKUMAR ARUNRAO
Date: 2025.04.21 15:16:49 +05'30'

**(अजितकुमार थोरात)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

२) सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, नागपूर.

३) कुलसचिव, संबंधित विद्यापीठ (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत).

४) संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)

५) निवड नस्ती/तांशि-४.